ध्वनी प्रदुषण (नियमन व नियंत्रण) नियम, २००० च्या अंमलबजावणीबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक. ध्वनीप्र-२००९/प्र.क्र.१२/०८/तां.क. १**

१५ वा मजला, नवीन प्रशासन भवन,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २२ ऑगस्ट, २०१७.

**वाचा :-** १) केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालयाची अधिसूचना क्र. एसओ १२३(ई), दि. १४.२.२०००.
२) केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालयाची अधिसूचना क्र. एसओ १००८(ई), दि. ११.१०.२००२
३) या विभागाचा शासन निर्णय ध्वनीप्र-२००९/प्र.क्र.१२/०८/तां.क. १, दि. ५.९.२०१६.
४) केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालयाची अधिसूचना क्र. का.आ.२५५५(अ), दि. १०.८.२०१७.

**प्रस्तावना :-**

केंद्रीय पर्यावरण मंत्रालयाच्या ध्वनी प्रदुषण (नियमन व नियंत्रण) नियम, २००० च्या परिच्छेद ५(२) नुसार ध्वनिक्षेपक व ध्वनिवर्धक यांचा वापर श्रोतृगृहे, सभागृहे, सामुहिक सभागृहे आणि मेजवानी कक्ष यासारख्या बंद जागा खेरीज इतर ठिकाणी (रात्री १० वा. पासून सकाळी ६ वाजेपर्यंत) करता येत नाही. या नियमामध्ये दि.११.१०.२००२ रोजीच्या अधिसूचनेन्वये केंद्र शासनाने सुधारणा केली असून नियम ५ मध्ये उपनियम (३) चा नव्याने समावेश करण्यात आलेला होता. त्यान्वये ध्वनी प्रदूषपणाची पातळी विहित मर्यादेत राखून वर्षभरामध्ये १५ दिवस ध्वनिक्षेपक व ध्वनिवर्धक यांचा वापर श्रोतृगृहे, सभागृहे, सामुहिक सभागृहे आणि मेजवानी कक्ष यासारख्या बंद जागा खेरीज इतर ठिकाणी रात्री १० वाजेपर्यंत ऐवजी रात्री १२ वाजेपर्यंत सांस्कृतिक कार्यक्रम व धार्मिक सणांकरिता करता येत होता. तसेच या अनुषंगाने जनहित याचिका क्र.१७३/२०१० मध्ये मा.उच्च न्यायलयाने दिनांक १६ ऑगस्ट, २०१६ रोजी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने ध्वनिक्षेपक व ध्वनिवर्धक वापरासाठी राज्य शासनाने निश्चित केलेल्या वर्षभरातील १५ दिवसांसाठी वेळेत सूट देण्यात आली होती. आता केंद्रीय पर्यावरण, वने व वातावरणीय बदल मंत्रालयाने दि.१० ऑगस्ट, २०१७ रोजी ध्वनी प्रदुषण (नियमन व नियंत्रण) नियम, २०१७ सुधारित अधिसूचना निर्गमित केलेली असून सदर अधिसूचनेन्वये नियम ३ मध्ये उपनियम (५) व नियम ५ मध्ये उपनियम (३) मध्ये सुधारणा केली आहे. आता नियम ५ मधील सुधारित उपनियम (३) नुसार ध्वनिक्षेपक व ध्वनिवर्धक यांचा वापर वर्षातील एकूण १५ दिवसांसाठी (श्रोतृगृहे, सभागृहे, सामुहिक सभागृहे आणि मेजवानी कक्ष यासारख्या बंद जागा वगळून) ध्वनीची विहित मर्यादा राखून सकाळी ६ वाजल्यापासून रात्री १२ वाजेपर्यंत करण्याकरिता वर्षभरातील १५ दिवस कोणते हे ठरविण्याची जबाबदारी संबंधित राज्य शासन किंवा राज्य शासनाने प्राधिकृत केलेल्या जिल्हा प्राधिकरणाची असल्याने ध्वनीक्षेपक व ध्वनीवर्धक वापरासाठी वेळेत सूट देण्याबाबत जबाबदारी निश्चित करण्याची बाब शासन विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या दि.१०/०८/२०१७ रोजीच्या ध्वनी प्रदूषण (नियमन व नियंत्रण) सुधारित नियम, २०१७ च्या नियम ५ उपनियम (३) व त्यासोबत दिलेल्या स्पष्टीकरणात्मक टिप्पणीनुसार ध्वनीक्षेपक व ध्वनीवर्धक इत्यादींच्या वापराबाबत श्रोतृगृहे, सभागृहे, सामुहिक सभागृहे आणि मेजवानी कक्ष यासारख्या बंद जागांखेरीज इतर ठिकाणी जिल्हयाच्या निकडीनुसार वर्षामध्ये १५ दिवस निश्चित करुन सकाळी ६ वाजल्यापासून ते रात्री १२ वाजेपर्यंत सूट जाहिर करण्याकरिता

संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना राज्य शासनाद्वारे या आदेशान्वये प्राधिकृत करण्यात येत आहे.

२. जिल्हाधिकारी यांनी संबंधित ध्वनी प्राधिकरण तथा जिल्हा पोलिस अधिक्षक / पोलिस आयुक्त यांच्याशी सल्लामसलत करुन जिल्हयासाठी १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधीमध्ये असे १५ दिवस निश्चित करुन त्याची आगाऊ यादी १ जानेवारी किंवा तत्पूर्वी जाहिर करावी. अशी सूट देतांना अधिसूचनेत घालून दिलेल्या ध्वनी मर्यादेचे व तरतूदींचे उल्लंघन होणार नाही व त्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना करण्याच्या अटी घालण्यात याव्यात. तसेच मा.उच्च न्यायालयाने वेळोवेळी ध्वनी प्रदूषणासंबंधात दिलेल्या आदेशात नमूद बाबींचे तंतोतंत पालन करावे व न्यायालयाच्या आदेशाचे उल्लंघन होणार नाही याची काळजी घेण्यात यावी.

३. जिल्हयात वरीलप्रमाणे ध्वनीवर्धक व ध्वनीक्षेपक वापरण्याबाबतची उपरोक्तनुसार सूट ही १५ दिवसांपेक्षा जास्त होणार नाही व ही सूट राज्य शासनामार्फत घोषित शांतता क्षेत्रात लागू नसल्याने त्याची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी, महानगरपालिका आयुक्त व ध्वनी प्रदूषण नियंत्रण प्राधिकरण यांची राहील. अशा प्रकाराची परवानगी देतांना ध्वनी प्रदूषण नियम २००० मधील नियम ३ व ४ चे पालन करण्यात यावे.

४. सन २०१७ या वर्षासाठी राज्य शासनाने दि.०५/०९/२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या १५ दिवसांपैकी आतापर्यंत ५ दिवसांची सूट राज्यभर उपयोगात आलेली असल्याने सर्व संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी आगामी उत्सव कालावधी लक्षात घेता सन २०१७ साठी उरलेले १० दिवस तात्काळ घोषित करुन त्याचा तपशिल प्रसिध्द करावा.

५. ध्वनी प्रदूषण नियम २००० अंतर्गत स्थापन केलेल्या ध्वनी प्राधिकरणाने त्यांच्याकडे प्राप्त तक्रारींवर मा. उच्च न्यायालयाने दि.१६ ऑगस्ट, २०१६ रोजी दिलेल्या आदेशात विहित पध्दतीने कार्यवाही करावी. तसेच प्राधिकरणाने निदर्शास आणून दिलेल्या बांबीवर सबंधित जिल्हाधिकारी किंवा प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ यांनी पर्यावरण संरक्षण कायदा, १९८६ च्या कलम १९(अ) नुसार कार्यवाही करावी.

६. या शासन निर्णयान्वये, पर्यावरण विभागाने यापूर्वी दि.०५/०९/२०१६ रोजी या विषयी निर्गमित केलेला शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे. हे आदेश शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तत्काळ लागू होतील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०८२२१३०२२१७९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vinayak G Kadoo

Digitally signed by Vinayak G Kadoo
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=92d45ee51f2a551db32f5e6056b22f84b99bcf4c38f0bae7d3cdb71a716490ad, cn=Vinayak G Kadoo
Date: 2017.08.22 12:51:27 +05'30'

**(वि.गो.कडू)**
कक्ष अधिकारी, पर्यावरण विभाग

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

२. सर्व सन्माननीय विधानसभा, विधान परिषद व संसद सदस्य.
३. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव.
४. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५. मा. मुख्य सचिव
६. अपर मुख्य सचिव, पर्यावरण विभाग
७. अपर मुख्य सचिव, गृह विभाग
८. प्रधान सचिव, गृह विभाग
९. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व सांस्कृतिक कार्य विभाग
१०.सचिव, नगर विकास विभाग
११.पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
१२.सर्व विभागीय आयुक्त
१३.सर्व जिल्हाधिकारी
१४.सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ
१५.मा. मंत्री व राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव
१६.सर्व पोलीस आयुक्त
१७.सर्व महानगरपालिका आयुक्त
१८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हापरिषद
१९.सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक
२०.सर्व मंत्रालयीन विभाग
२१.सर्व कार्यासने, पर्यावरण विभाग, मंत्रालय
२२.सर्व मुख्यधिकारी, नगरपालिका
२३.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय (प्रसिध्दीसाठी)
२४.संचालक, मुंबई दूरदर्शन (प्रसिध्दीसाठी)
२५.संचालक, आकाशवाणी, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
२६.निवड नस्ती.